राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-९ अंतर्गत परिविक्षाधीन मुख्याधिकारी गट “अ” व गट “ब” अधिकारी यांच्या तांत्रिक प्रशिक्षणासाठी निधी वितरीत करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-२०२३/प्र.क्र.१८८/नवि-२०
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक :- २८ फेब्रुवारी, २०२५

वाचा :

१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. टिआरएन-०६२३/प्र.क्र.६४/सीपीटीपी, दि.२२ सप्टेंबर, २०२३
२) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.एमसीओ-२०२३/प्र.क्र.३२७/नवि-१४, दि.०६ नोव्हेंबर, २०२३
३) आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांचेकडील पत्र क्र.नपप्रसं/मु.अ.परिविक्षा-नस्ती/२०२४/कक्ष-२/८८२६, दि.३० डिसेंबर, २०२४ रोजीचा प्रस्ताव.

प्रस्तावना :-

राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-९ अंतर्गत नगर विकास विभागाच्या संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयानुसार परिविक्षाधीन प्रशिक्षणार्थी मुख्याधिकारी, गट-अ व गट-ब संवर्गातील उमेदवारांची परिविक्षाधीन प्रशिक्षण कालावधीकरिता अधिसंख्य पदे निर्माण करुन नियुक्ती करण्यात आली आहे. एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-९ अंतर्गत मुख्याधिकारी गट-अ व गट-ब या संवर्गातील परिविक्षाधीन अधिकाऱ्यांचा आठ आठवडयांचा तांत्रिक प्रशिक्षण कार्यक्रम व विभागीय परीक्षा सत्र-२ वनामती, नागपूर अंतर्गत दि.२३.०१.२०२४ ते दि.१८.०३.२०२४ या कालावधीत (एकूण ५६ दिवस) वनामती, नागपूर येथे संपन्न झालेला आहे. परिविक्षाधीन मुख्याधिकारी गट-अ चे १५ व गट-ब चे ७० प्रशिक्षणार्थी याप्रमाणे एकूण ८५ परिवीक्षाधीन प्रशिक्षणार्थींचा तांत्रिक प्रशिक्षणाचा निधी वितरीत करण्याचा प्रस्ताव आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांनी सादर केला होता. त्यानुसार सन २०२४-२०२५ या आर्थिक वर्षामध्ये मुख्याधिकारी गट-अ चे १५ व मुख्याधिकारी गट-ब चे ७० याप्रमाणे एकुण ८५ अधिकाऱ्यांच्या तांत्रिक प्रशिक्षणासाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :

आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, नवी मुंबई यांनी प्रस्तावित केल्याप्रमाणे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या राज्यसेवा परिक्षा २०२१ च्या अंतीम निकालाच्या आधारे शिफारस प्राप्त मुख्याधिकारी गट- "अ" व "ब" उमेदवारांचा दि.२३.०१.२०२४ ते दि.१८.०३.२०२४ या कालावधीत आयोजित तांत्रिक प्रशिक्षण कार्यक्रम व विभागीय परिक्षा सत्र २ वनामती नागपूर अंतर्गत प्रशिक्षण कार्यक्रमास वर्ग १ चे १५ प्रशिक्षणार्थी तसेच वर्ग -२ चे ७० प्रशिक्षणार्थी याप्रमाणे एकूण ८५ परिविक्षाधिन प्रशिक्षणार्थी उपस्थित होते. सामान्य प्रशासन विभागाच्या दि.०८.०८.२०१४ व दि.०८.०४.२०१९ च्या शासन निर्णयान्वये वनामती, नागपूर या संस्थेमार्फत मुख्याधिकारी गट-अ व गट-ब या संवर्गातील परिविक्षाधीन अधिकाऱ्यांना देण्यात येणाऱ्या आठ आठवडयांच्या तांत्रिक प्रशिक्षणासाठी अनुज्ञेय करण्यात आलेले दर दिवशी दर प्रशिक्षणार्थी रुपये ३,५०० या प्रमाणे (रु.३५०० X ८५ प्रशिक्षणार्थी X ५६ दिवस) = रु.१,६६,६०,०००/- (रुपये एक कोटी सहासष्ट लाख साठ हजार फक्त) इतका खर्च आकारण्यात आला आहे.

सदर प्रशिक्षणासाठी आकारण्यात आलेल्या एकूण रक्कम रु.१,६६,६०,०००/- इतक्या निधीपैकी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता मागणी क्रमांक एफ-०३, मुख्य लेखाशिर्ष २२५१-सचिवालयीन सामाजिक सेवा, २२५१०९९१-शासकीय कर्मचाऱ्यांना प्रशिक्षण कार्यक्रम, ५०-इतर खर्च या लेखाशीर्षांतर्गत अर्थसंकल्पित रक्कम

रु.१,००,००,०००/- (रुपये एक कोटी फक्त) इतका निधी वितरीत करण्यास सदर शासन निर्णयातील खालील नमूद अटी व शर्तीच्या अधिन राहून मान्यता देण्यात येत आहे.

१) ज्या उद्देशासाठी निधी मंजूर आहे त्या व्यतिरिक्त इतर उद्देशासाठी खर्च करता येणार नाही. तसेच इतर लेखाशीर्षाकडे वळती करता येणार नाही.
२) प्रशिक्षणार्थींचा प्रवासभत्ता हा वित्त विभागाच्या शासन निर्णयानुसार मंजूर असलेल्या त्या-त्या संवर्गाच्या दरानुसार अनुज्ञेय राहील.

**०२.** या बाबीवरील खर्च मागणी क्र.एफ-३, २२५१, सचिवालयीन-सामाजिक सेवा, ००, ००३, प्रशिक्षण (००) (००) (०१) शासकीय कर्मचाऱ्यांना प्रशिक्षण (२२५१०९९१) ५०, इतर खर्च (वेतनेतर) या लेखाशिर्षातून सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पीत केलेल्या तरतूदीतून करण्यात यावा.

**०३.** या शासन निर्णयानुसार मंजूर व वितरीत करण्यात येत असलेल्या रु.१,००,००,०००/- (रुपये एक कोटी फक्त) या निधीचे कार्यान्वयन यंत्रणेस वितरण करण्यासाठी उपायुक्त नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी तसेच सहायक आयुक्त (लेखा) नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदरचा निधी आहरीत करुन कार्यान्वयन यंत्रणेस वितरीत करावा.

**०४.** सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.१२.०२.२०२५ च्या परिपत्रकामधील अटी व शर्तीच्या अधीन राहून तसेच वित्त विभागाने त्यांचे अनौपचारीक संदर्भ क्र.७८/२०२५/व्यय-३, दिनांक ३१.०१.२०२५ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**०५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०२२८१६१९५१७०२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANILKUMAR RAMDASPANT UGLE

Digitally signed by ANILKUMAR RAMDASPANT UGLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=1d265dc74c98f72f41f5a1403db16525e09e7de2e336c366de3a32ea2a050a8a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8BBD8635D43D23F28021156F38051619258C51238668F40D15D3209EA39554AA, cn=ANILKUMAR RAMDASPANT UGLE
Date: 2025.02.28 16:20:54 +05'30'

**(अनिलकुमार उगले)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१. मा.प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
२. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
६. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
७. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, बेलापूर, नवी मुंबई
८. उप सचिव (नवि-२०), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
९. निवडनस्ती